राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाच्या शिफारशीनुसार मृत न्यायाधीन बंदी श्री.जगन्नाथ पिराजी इंगोले यांच्या अवलंबितांना रु.१,००,०००/- (रुपये एक लाख फक्त) एवढ्या रकमेची नुकसान भरपाई म्हणून "अंतरिम मदत" मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक-एमआयएस-०१९९/१६/प्र.क्र.६२/पीआरएस-२.

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- ५ऑक्टोबर १९९९.

वाचा:- सहाय्यक प्रबंधक राष्ट्रीय मानवी हक्क आयोग (विधी विभाग) नवी दिल्ली यांचे इंग्रजी पत्र क्रमांक-३६/१३/१८०/९६/एलडी दिनांक १२.७.१९९९.

<u>शासन निर्णय:-</u> न्यायाधीन बंदी श्री.जगन्नाथ पिराजी इंगोले हा ठाणे मध्यवर्ती कारागृहातून नाशिक रोड कारागृहात दिनांक ७.५.९५ रोजी दाखल झाला. त्यानंतर पोटामध्ये सूज आल्यामुळे त्याला दिनांक १७.१०.१९९६ रोजी कारागृह इस्पितळात दाखल करण्यात आले व नंतर दिनांक २.११.१९९६ रोजी सिव्हील रुग्णालयात तज्ञांच्या निदानास्तव पाठविण्यात आले. तदनंतर अतिसार व गंभीर रक्तक्षयामुळे पुन्हा पुढील उपचारार्थ सदर बंद्यास सिव्हील रुग्णालय,नाशिक येथे दिनांक ३.२.१९९७ रोजी दाखल केले असता तेथे त्याच दिवशी त्याचा मृत्यू झाला.

या प्रकरणी बंद्याच्या जगण्याच्या मानवी हक्काच्या संरक्षणाकडे दुर्लक्ष झाले असल्याने व परिणामी बंद्याच्या मानवी हक्काचे उल्लंघन झाले आहे,असे राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाचे मत झाल्यामुळे या संदर्भात राष्ट्रीय मानवी हक्क आयोगाने मृत न्यायाधीन बंदी श्री.जगन्नाथ पिराजी इंगोले यांच्या कुटुंबाला नुकसान भरपाई म्हणून रुपये १ लाख(रुपये एक लाख फक्त) एवढी रकम १ महिन्याच्या आंत "अंतरिम मदत" म्हणून देण्यात यावी अशी शिफारस केली आहे व त्याप्रमाणे मृत न्यायाधीन बंदी श्री.जगन्नाथ पिराजी इंगोले यांच्या कुटुंबाला रुपये एक लाख एवढया रक्कमेची नुकसान भरपाई "अंतरिम मदत" म्हणून देणे आवश्यक आहे.

मृत न्यायाधीन बंदी श्री.जगन्नाथ पिराजी इंगोले यांच्या अवलंबितांस रुपये१,००,,०००/- (रुपये एक लक्ष फक्त) एवढी रक्कम आकस्मिकता निधीतून अग्रीम म्हणून ह्या आदेशान्वये कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे. ही रक्कम त्यांनी मृत न्यायाधीन बंदी श्री.जगन्नाथ पिराजी इंगोले यांच्या अवलंबितांस दिनांक ११ ऑक्टोबर १९९९ पूर्वी अदा करावी.

वरीलप्रमाणे रु.१ ,००,०००/- (रुपये एक लक्ष फक्त) एवढा येणारा खर्च मागणी क्रमांकबी-७,२०५६-तुरुंग-१०१(दोन) जिल्हा तुरुंग-२० इतर खर्च (२०५६००१६२) योजनेतर भारित या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व हा खर्च आकस्मिकता

निधीतून मंजूर करण्यात आलेल्या अग्रीमातून भागविण्यात यावा. आकस्मिकता निधी अग्रीमातून करावयाच्या खर्चासंबंधी देयके काढताना ८००००८०२ या संगणक संकेतांकाचा वापर करावा. आकस्मिकता निधी अग्रिमाची प्रतिपूर्ती करण्यासाठी पूर्ण रकमेची पूरक मागणी आगामी अधिवेशनात रितसर सादर करण्यात येईल.

नियंत्रक अधिकाऱ्यांना असेही कळविण्यात येते की, त्यांनी आकस्मिकता निधी खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकाऱ्याकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात आणि या रकमेतून खर्च करताना सादर करण्यात येणाऱ्या देयकावर "आकस्मिकता निधी अग्रीम शासन निर्णय,वित्त विभाग,क्रमांक-आकनि-११९९/८०/अर्थसंकल्प-१० दिनांक १.१०.९९ अन्वये मंजूर" असे लाल शाईने लिहावे ,असी स्पष्ट सूचना अंतर्भूत करावी व ही सूचनाही लाल शाईने अधोरेखित करावी. तसेच आकस्मिकता निधीतून काढलेल्या अग्रीमातून करावयाच्या खर्चाबाबत महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिकेतील प्रकरण-१६ मध्ये विशद केलेल्या नियमांचे व वित्त विभाग परिपत्रक क्रमांक-सीएनएफ/सीएलएफ-१०८३/१४०/अर्थसंकल्प-३ दिनांक २६ एप्रिल १९८३ व परिपत्रक क्रमांक- सीएनएफ-१०८६/१५३/अर्थसंकल्प-३ दिनांक २८.४.८६ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांचेही काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच अग्रीमातून प्रत्यक्ष केलेल्या खर्चाची एकत्रित माहिती त्यांनी दर महिन्याच्या १५ तारखेपर्यंत वित्त विभाग (अर्थसंकल्प -३) मंत्रालय,मुंबई यांना पाठवावी व त्याची एक प्रत मा.प्रधान सचिव(परिवहन),गृह विभाग यांचेकडे पाठविण्यात यावी.

हा निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-सीआर-७२८/९९/व्यय-८ दिनांक २६.८.९९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(मु.ज.कुळकर्णी)
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) पुणे/पश्चिम विभाग, पुणे /मध्य विभाग, औरंगाबाद/ पूर्व विभाग,नागपूर/दक्षिण विभाग,मुंबई.
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
निवासी लेखा अधिकारी,मुंबई.

कोषागार अधिकारी,पुणे.

सहसंचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नवीन प्रशासन भवन,५ वा मजला,मुंबई.
(दोन प्रती)

वित्त विभाग (व्यय-८/अर्थसंकल्प-३/१०)

गृह विभाग,पोयुडी-१.

निवडनस्ती.